श्रीक्षेत्र देहू-आळंदी, भंडारा डोंगर, पंढरपूर व पालखीतळ मार्गावरील मूलभूत सुविधा निर्माण करण्यासाठी विकास आराखडा,
निधी वितरीत करणेबाबत...

महाराष्ट्र शासन
नियोजन विभाग
शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०२०/प्र.क्र.४५/का.१४४४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १४ ऑगस्ट, २०२०

वाचा :-

नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१८/प्र.क्र.६६/का.१४४४,
दि. १३ नोव्हेंबर, २०१८

प्रस्तावना :-

श्रीक्षेत्र देहू-आळंदी, भंडारा डोंगर, पंढरपूर व पालखीतळ मार्गावरील मूलभूत सुविधा निर्माण करण्यासाठीच्या विकास आराखड्यास दिनांक १३ नोव्हेंबर, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये, रु.१४२७.८५ कोटी शासन सहभागातील कामांना मंजुरी देण्यात आली आहे. या आराखड्याकरिता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी विभागीय आयुक्त, पुणे यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णयः-

श्रीक्षेत्र देहू-आळंदी, भंडारा डोंगर, पंढरपूर व पालखीतळ मार्गावरील मूलभूत सुविधा निर्माण करण्यासाठीच्या विकास आराखड्यांतर्गत खालील बाबींसाठी विभागीय आयुक्त, पुणे यांना रु. ३.५० लाख (रुपये तीन लाख पन्नास हजार फक्त) निधी वितरित करण्यात येत आहे. या निधीचे उद्दिष्टनिहाय वाटप खालीलप्रमाणे आहे.:-

| मुख्य लेखाशिर्ष | उद्दिष्ट | अर्थसंकल्पित निधी | यापूर्वी वितरित केलेला निधी | या शासन निर्णयान्वये वितरित करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| ३४५२ (पर्यटन) ३४५२ २७११ | ०१, वेतन | ३५,००,०००/- | १२,२५,०००/- | ३,५०,०००/- |

२. सदरहू खर्च लेखाशिर्ष “मागणी क्र.ओ-८, मुख्य लेखाशिर्ष ३४५२-पर्यटन, ०१-पर्यटनसाठी पायाभूत सुविधा, १०१-पर्यटन केंद्रे, (००) (०१) श्रीक्षेत्र देहू-आळंदी, भंडारा डोंगर, पंढरपूर व पालखीतळ क्षेत्र विकास विशेष कृती कार्यक्रम (३४५२ २७११) योजनातंर्गत (दत्तमत)” याखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. वर नमूद केलेल्या लेखाशिर्षांतर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाचा ताळमेळ घालण्यात यावा. वितरित केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२० अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८१४१११४७४३३१११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a94ef1b631f4673b829ac9adbeb5b0ddabd086a7544e3fdf47cd7a011ff7ea40, ou=PLANNING DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2020.08.14 11:57:32 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
उप सचिव

**आवश्यक कार्यवाहीसाठी,**

विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे,

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. विरोधी पक्षनेता विधानपरिषद / विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५) मा. राज्यमंत्री उद्योग व खणीकर्म, व पर्यावरण तथा पालकमंत्री,(पुणे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) सर्व सन्माननीय विधानसभा, विधान परिषद व संसद सदस्य,
८) मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर,
११) जिल्हाधिकारी, पुणे/सोलापूर,/सातारा/अहमदनगर,
१२) विशेष कार्य अधिकारी, विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे,
१३) वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई,
१४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१५) नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई,
१६) निवड नस्ती, का. १४४४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

-------------------